**कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य बजावत असताना कोरोना विषाणूचा संसर्ग होऊन मृत्यू पावलेल्या कर्मचाऱ्यांच्या कुटूंबियांना विमा कवच / सानुग्रह सहाय्य मंजूर करण्याबाबत.**
**कै. (श्री.) मिश्रिलाल जिवनलाल झाडखंडे, मुख्याध्यापक.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन ज्ञापन क्रमांक : सहाय्य-२०२१/प्र.क्र.९०/टीएनटी-६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई -४०० ०३२
दिनांक : ०६ जून, २०२३

**संदर्भ:-**

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण २०२०/प्र.क्र. ४/व्यय-९, दिनांक २९.०५.२०२० व दिनांक. १४.१०.२०२०.
२) शालेय शिक्षण व क्रीडा विभागाचे क्रमांक: सहाय्य-२०२०/प्र.क्र.८१ /टीएनटी-६, दिनांक ०७.१२.२०२० व दिनांक १६.०३.२०२१ चे पत्र.
३) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) यांचे पत्र क्र. कोव्हीड-१९/विमा कवच/ झाडखंडे /२०२१-२२/टि ७/३३६२, दिनांक ०८/१०/२०२१
४) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) यांचे पत्र क्र. कोव्हीड-१९/ विमा कवच/सहाय्य/ झाडखंडे/२२-२३/टि-७/७१६९,दिनांक ११/११/२०२२
५) तहसिलदार कार्यालय तथा इन्सिडेंट कमांडर, चिखलदरा यांचे क्र. अ.का./नै.आ./कोवीड-१९/कावी-२१७/२०२१,दि.३०/०४/२०२१ चे नियुक्ती आदेश.

**ज्ञापन :-**

(कै.) मिश्रिलाल जिवनलाल झाडखंडे, मुख्याध्यापक यांचा कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य बजावताना कोव्हिड-१९ मुळे दिनांक ०९/०५/२०२१ रोजी मृत्यू झालेला आहे.

२. (कै.) मिश्रिलाल जिवनलाल झाडखंडे, मुख्याध्यापक यांच्या वारसास वित्त विभागाच्या संदर्भ क्र. (१) येथील दिनांक २९.०५.२०२० च्या शासन निर्णयानुसार रु. ५०.०० लक्ष रकमेचे सानुग्रह सहाय्य देण्याबाबतचा प्रस्ताव शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) यांनी संदर्भ क्र. (३) व (४) येथील पत्रान्वये सादर केला आहे.

३. (कै.) मिश्रिलाल जिवनलाल झाडखंडे, सहा.शिक्षक पदावर स्व. श्री. गोविंद फ़त्तूजी झाडखंडे, माध्यमिक विद्यालय, बामादेही, ता. चिखलदरा, जि. अमरावती येथे दिनांक २६/०६/२००७ पासून कार्यरत होते.

४. कै.(श्री.) झाडखंडे हे कोरोना विषाणू प्रादुर्भाव व प्रतिबंधात्मक उपाययोजनेच्या अनुषंगाने घरोघरी जावून नागरिकांची नोंदणी करुन घेण्याचे कामकाज केले आहे. सदर बाब तहसिलदार तथा इंन्सिडेंट कमांडर, चिखलदरा यांनी दि. १३/०५/२०२१ अन्वये प्रमाणित केले आहे.

५. कै.(श्री.) झाडखंडे यांचा कोव्हिड-१९ मुळे दिनांक ०९/०५/२०२१ रोजी मृत्यू झाल्याचे जिल्हा सामान्य रुग्णालय, अमरावती यांनी दिलेल्या मृत्यू अहवालावरुन स्पष्ट होते.

६. जिल्हा सामान्य रुग्णालय, अमरावती यांचेकडील कै. (श्री.) झाडखंडे यांचे मृत्यू प्रमाणपत्र सादर करण्यात आले आहे. कै.(श्री.) मिश्रिलाल जिवनलाल झाडखंडे यांनी कायदेशिर वारस म्हणून वारस (१) श्रीमती उर्मिला मिश्रिलाल झाडखंडे, (२) कु.वैश्नवी मिश्रिलाल झाडखंडे, (३) श्री.जयकुमार मिश्रिलाल झाडखंडे व (४) श्रीमती जयंती जीवनलाल झाडखंडे यांना एकत्रित रु. ५०.०० लक्ष (रुपये पन्नास लक्ष फक्त) इतक्या रकमेचे सर्वकष वैयक्तिक अपघात विमा कवच / सानुग्रह सहाय्य प्रदान करण्यास वित्त विभागाच्या दिनांक २९/०५/२०२० च्या शासन निर्णयानुसार याद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

७. प्रस्तुत प्रस्तावावरील खर्च वित्त विभागाच्या अभिप्रायानुसार तसेच त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१६४/२०२३/व्यय-९, दिनांक १२/०५/२०२३ अन्वये खाली नमूद लेखाशीर्षाखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल.

> "मागणी क्रमांक ई-२, (००)(०१) सर्वसाधारण माध्यमिक शाळांना सहायक अनुदान (अनिवार्य), (२२०२ ०४४२), ३१- सहायक अनुदान (वेतनेतर)."

८. सदर शासन ज्ञापन, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संकेतांक २०२३०६०६१७०३४०५९२१ असा आहे. हे शासन ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

TUSHAR VASANT MAHAJAN

Digitally signed by TUSHAR VASANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e8918118634069a6cc7a22b9f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1A39CEF3C157B9EE6A2ABE5779ACF233682613F7B9C335D6BF4877267695CECA, cn=TUSHAR VASANT MAHAJAN
Date: 2023.06.06 17:06:33 +05'30'

**(तुषार महाजन)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत, माहिती व आवश्यक कार्यवाहीकरीता:-**

१. आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. शिक्षण संचालक (माध्यमिक), पुणे
३. विभागीय शिक्षण उपसंचालक, अमरावती
४. जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती
५. अधिक्षक, वेतन व भविष्य निर्वाह निधी पथक, (माध्यमिक), अमरावती

**प्रत:- माहितीसाठी**

६. वित्त विभाग (व्यय ९)/(व्यय ५), मंत्रालय, मुंबई
७. कक्ष अधिकारी/अवर सचिव (एस एम ४)/अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
८. श्रीमती उर्मिला मिश्रिलाल झाडखंडे, रा. बामादेही, .ता.चिखलदरा, जि. अमरावती
९. निवड नस्ती (टीएनटी-६)(प्र.क्र. ९०/२०२१).